गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजनेतर्गंत विविध जिल्ह्यात झालेल्या कामांना निधी वितरण करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- गामुध २०२४/प्र.क्र.३३ (भाग-१)/जल-१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ०६ मार्च, २०२४

वाचा:-
१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल,२०२३.
२. शासन निर्णय,मृद व जलसंधारण विभाग क्र: जशिअ-२०२२/प्र.क्र ३०२/जल-७, दि.३.१.२०२३
३. शासन निर्णय , मृद व जलसंधारण विभाग क्र: गामुध २०२२/प्र.क्र.२२/जल-१३, दि. २०.०४.२०२३
४. शासन पुरकपत्र क्र.गामुध-२०२२/प्र.क्र.२२/जल-१३ (जल-१),दि.०५.०२.२०२४
५. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०५.०२.२०२४

प्रस्तावना:-

गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार ही योजना राज्यात कायमस्वरुपी राबविण्याचा निर्णय शासन निर्णय दि. २०.०४.२०२३ नुसार घेण्यात आला आहे. त्यानुसार सदर योजनेंतर्गत विविध जिल्ह्यात गाळ काढण्याची कामे करण्यात आली आहेत. जलयुक्त शिवार २.० व गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजनेचा आढावा घेण्यासाठी मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दि.२९.१२.२०२३ रोजी आयोजित बैठकीत झालेल्या निर्णयानुसार गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजनेची अंमलबजावणी करतांना कामामध्ये अनेक वेळा व अनेक ठिकाणी मशीन द्वारे गाळ काढणे करिता स्वयंसेवी संस्था उपलब्ध होत नाही व त्याअभावी कामे रखडतात, असे निदर्शनास आले आहे. त्यामुळे अशासकीय संस्था उपलब्ध नसल्यास अशा वेळी ग्रामपंचायतमार्फत कामे करण्याबाबत विभागामार्फत तपासणी करण्याचे तसेच देयके अदा करण्याच्या कार्यपध्दतीमध्ये सुलभता आणून जिल्हास्तरावर देयके अदा करण्याची कार्यपध्दती अवलंबविण्यात यावी, असे निर्देश सदर बैठकीत देण्यात आले आहे. त्यानुषंगाने राज्यात गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजना अधिक सुलभतेने व गतीने राबविण्यासाठी दि.२०.४.२०२३ च्या शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्यात आली असून त्यासंदर्भात शासन पुरकपत्र दि. ५.२.२०२४ निर्गमित करण्यात आले आहे.

शासन पुरकपत्र दि. ५.२.२०२४ नुसार कार्यकारी अभियंता, मृद व जलसंधारण विभाग यांनी संबंधित अशासकीय संस्था/ग्रामपंचायतीस देयके जिल्हास्तरावर अदा करावीत. त्यासाठी एकत्रित निधी मागणी जिल्हा जलसंधारण अधिकारी यांनी जिल्हाधिकारी यांच्या मार्फत शासनास करावी, अशी सुधारणा करण्यात आली आहे. गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजनेसंदर्भात झालेल्या कामाची देयके अदा करण्याची कार्यवाही जिल्हास्तरावर करण्यात येणार आहे व त्यासाठी आवश्यक निधी शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येणार आहे. त्यानुसार विविध कार्यकारी

अभियंता, मृद व जलसंधारण विभाग यांचेकडून सदर योजनेंतर्गत झालेल्या कामाची देयके अदा करण्यासाठी निधी मागणी विवरणपत्रानुसार सादर केलेली आहे. सदर प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार निधी वितरीत करणे आवश्यक आहे. त्यानुसार सदर योजनेच्या झालेल्या कामासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजनेतंर्गत विविध जिल्ह्यात गाळ काढण्याची कामे अशासकीय संस्थेमार्फत करण्यात आलेली आहे. सदर कामांचे देयक अदा करण्यासाठी एकूण रुपये **रु.५,०८,८१,२५०/- (रुपये पाच कोटी आठ लक्ष एक्याऐंशी हजार दोनशे पन्नास)** इतका निधी **खालील विवरणपत्र "अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे** वितरित करण्यास याद्वारे शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**विवरणपत्र 'अ'**

| अ.क्र. | जिल्हा | काम करणारी अशासकीय संस्था | एकूण कामे | देयकाच्या विवरणपत्रानुसार वितरीत करावयाचा निधी (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | छत्रपती संभाजीनगर | ज्योती बहुउद्देशिय सेवाभावी संस्था व प्रेरणा फाउंडेशन | ३३ | रु. २,०१,९२,९४१/- |
| २ | बीड | १) माऊली बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, मुर्शदपूर<br>२) नरसिंह शिक्षण प्रसारक मंडळ, केज<br>३) राजे संभाजी प्रतिष्ठान<br>४) रमाबाई मागासवर्गीय सेवाभावी संस्था | १० | रु. १,२१,५०,२४९/- |
| ३ | रायगड | १) सुरभी स्वंयसेवी संस्था, अलिबाग<br>२)राजमाता जिजाऊ कलाक्रिडा बहुउद्देशिय संस्था,पुणे<br>३)रक्षित सामाजिक संस्था, म्हसाळा, जि.रायगड | ०८ | रु. १,११,८०,०६०/- |
| ४. | अहमदनगर | लोकपंचायत, संगमनेर जि.अहमदनगर | ०९ | रु. ७३,५८,०००/- |
| | | **एकुण रुपये** | | **रु.५,०८,८१,२५०/-** |

२. उपरोक्त निधी पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे:-

अ) उपरोक्त विवरणपत्र अ नुसार जिल्हानिहाय निधी आयुक्त यांनी तात्काळ संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी यांना वितरीत करावा.

ब) गाळ काढलेल्या कामाची व पंचनामा करुन गाळ नेणाऱ्या शेतकऱ्यांना अदा करावयाच्या अनुदानाची खातरजमा करुन, देयकाच्या आधारे निधीचे वितरण करण्यात यावे.

क) मंजूर (अदा करावयाच्या) निधीपेक्षा जास्तीची रक्कम अदा करण्यात येऊ नये.

ड) कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदरची रक्कम परस्पर अन्य कामासाठी वितरीत न करता तातडीने शासनाकडे प्रत्यार्पित करावी.

इ) निधी वितरणासंबंधित गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजने संदर्भातील शासन निर्णयान्वये निर्धारित कार्यपध्दती व सुचनांचे/तरतुदींचे अनुपालन करण्यात आले असल्याबाबतची खातरजमा करण्यात यावी.

ई) वितरीत करण्यात येत असलेला निधी गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार अंतर्गत झालेल्या कामासाठीच वितरीत करण्यात यावा.

ए) निधी वितरीत करताना संबंधित कामाबाबत तक्रार नसल्याची खातरजमा करावी.

ऐ) उपलब्ध करुन देण्यात येत असलेला निधी तात्काळ खर्च करण्याबाबतची कार्यवाही करावी.

अं) गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजनेतर्गत झालेल्या कामाच्या देयकांची छाननी व देयके तपासण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी यांची राहील.

आं) सदर निधी वितरण करताना काही अनियमितता झाल्यास त्यास संबंधित कार्यालय जबाबदार राहील.

३. याद्वारे अशासकीय संस्थांना जिल्हा जलसंधारण अधिकारी यांनी सदंर्भीय क्र ४ येथील शासन निर्णयातील निधी वितरण तरतूदीनुसार वितरीत करावे.

४. यावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक - झेडएच-५**
**(०२) जलयुक्त शिवार**
**(०२)(०१) जलयुक्त शिवार अभियान (कार्यक्रम) (४४०२ २७८१)**
**५३, मोठी बांधकामे**

५. याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी यांची राहील तसेच तालुका स्तरावर उपविभागीय जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग यांची राहील.

६. प्रस्तुत आदेश, वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०६१८१२५०३५२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SUNIL MAHADEV KALE

Digitally signed by SUNIL MAHADEV KALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=d5c8d23e6cc09fb2bb4aa1777dadbfbb405c54e877afe06798f54168b9f08b98, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=30B26A65349009C49CCA04C5AECBC47F35D7524B402BBD5D7FA6DDD215CFF18D, cn=SUNIL MAHADEV KALE
Date: 2024.03.06 18:22:14 +05'30'

**( सु. म. काळे )**
**मुख्य अभियंता तथा सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मंबई
२. मा. मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव.
३. मा.विरोधीपक्ष नेता, विधान परिषद/विधानसभा, विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
४. सर्व मा.संसद सदस्य, विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खासगी सचिव
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
८. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
९. मा. सचिव (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक.
१०.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षण), महाराष्ट्र -२, नागपूर.
११.आयुक्त मृद व जलसंधारण, जल आयुक्तालय, औरंगाबाद.
१२.सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय
१३.मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद
१४.अपर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, नागपूर/पुणे
१५.संबंधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग
१६.जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अहमदनगर, रायगड, बीड, छत्रपती संभाजीनगर.
१७.जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, रायगड, बीड, छत्रपती संभाजीनगर.
१८. कक्ष अधिकारी, कार्यासन जल-११, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९.निवड नस्ती जल-१